**शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, भंडारा या संस्थेकरीता ४३ सुरक्षा रक्षकांची सेवा महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ (मेस्को), नागपूर या संस्थेकडून सेवा घेण्यास मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुरक्षा-१२२४/प्र.क्र.४५६/प्रशासन-२

९ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, लोकमान्य टिळक मार्ग,
नविन मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख : १४ फेब्रुवारी, २०२५.

वाचा :-

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांकः एसजीए-१५०६/प्र.क्र.९२/काम-५, दिनांक ०८.११.२००६.

२) शासन अधिसूचना, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांकः एसजीए-२०१४/प्र.क्र.३००(२) /कामगार-५, दिनांक ३०.०७.२०१४.

३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

४) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांचे पत्र क्र. संवैशिवसं/शावैमभंडारा/ सुरक्षारक्षक/मेस्को/१५४२३/२०२४, दिनांक ०४.१२.२०२४.

**प्रस्तावना :-**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, भंडारा येथील वैद्यकीय अधिकारी, कर्मचारी, विद्यार्थी तसेच संस्थेतील यंत्र सामुग्री, फर्निचर व इतर वस्तुंच्या सुरक्षेच्या दृष्टीने सुरक्षा रक्षकांच्या सेवा महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ, नागपूर यांच्याकडून घेण्याचा प्रस्ताव वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाने संदर्भ क्र. ४ वरील पत्रान्वये शासनास सादर केला होता. त्यानुषंगाने, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, भंडारा येथे सुरक्षा रक्षक सेवा घेण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, भंडारा येथील वैद्यकीय अधिकारी, कर्मचारी, विद्यार्थी तसेच संस्थेतील यंत्र सामुग्री, फर्निचर व इतर वस्तुंच्या सुरक्षेच्या दृष्टीने ४० सुरक्षा रक्षक व ०३ सुरक्षा पर्यवेक्षक असे एकूण ४३ सुरक्षा रक्षक खालील नमूद केल्याप्रमाणे महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ (मेस्को), नागपूर या सेवा पुरवठादाराकडून उपलब्ध करुन घेण्यास व त्याकरीता येणाऱ्या रु.१,७३,५६,५९२/- (जी. एस. टी. सह)

(रुपये एक कोटी त्र्याहत्तर लाख छपन्न हजार पाचशे ब्याण्णव फक्त) इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

| पदनाम | आवश्यक पदसंख्या | एका पदाकरिता येणारा मासिक खर्च | एकुण पदांकरिता येणारा मासिक खर्च | एकुण पदांकरिता येणारा वार्षीक खर्च |
|---|---|---|---|---|
| सुरक्षा पर्यवेक्षक | ०३ | रु.३९,८३६/- | रु.१,१९,५०८/- | रु.१४,३४,०९६/- |
| सुरक्षा रक्षक | ४० | रु.२७,६५६/- | रु.११,०६,२४०/- | रु.१,३२,७४,८८०/- |
| **एकुण** | **४३** | | **रु.१२,२५,७४८/-** | **रु.१,४७,०८,९७६/-** |
| | | | **१८% जी. एस. टी.** | **रु.२६,४७,६१६/-** |
| | | | **(१८% जी. एस. टी. सह) एकुण** | **रु. १,७३,५६,५९२/-** |

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम भाग पहिला, उप विभाग -४, अ.क्र. ११ अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर सुरक्षा सेवा उपलब्ध करुन घेण्यासाठी येणारा खर्च संबंधित संस्थेच्या (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टांतर्गत उपलब्ध अर्थसंकल्पीत निधी मधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२१४१९०७०५८७१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO
GIRDHARI
JOGDAND

Digitally signed by MAHADEO GIRDHARI JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT,
2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO GIRDHARI JOGDAND
Date: 2025.02.14 19:07:52 +05'30'

**(म. गि. जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, भंडारा.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा.
६. क्षेत्रीय व्यवस्थापक, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ (मेस्को), क्षेत्रीय कार्यालय, नागपूर.
७. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, भंडारा.
८. निवडनस्ती (प्रशा-२)